# इकबाल मसीह

## पाकिस्तानचा एक शूर मुलगा

जीनत विंटर



# इकबाल मसीह

## पाकिस्तानचा एक शूर मुलगा

जीनत विंटर



मराठी : अश्विनी बर्वे

# इकबाल मसीह (1982-1995)

इकबाल मसीहचा जन्म पाकिस्तानमध्ये लाहौरच्या जवळ मुरीदके गावात झाला. जेव्हा तो फक्त चार वर्षांचा होता, तेव्हा त्याच्या गरीब आईवडिलांनी एका गालिच्याच्या कारखाना मालकाकडून बारा डॉलर उधार घेतले होते. कर्जाच्या बदल्यात, इकबाल एक मजदूर झाला, जोपर्यंत कर्ज फेडत नाही तो पर्यंत रोज इकबाल गालिच्याचे काम करावे लागणार होते. तो दिवसभरात फक्त २० सेंटच मिळवत होता.

जेव्हा इकबाल दहा वर्षांचा झाला, तेव्हा पाकिस्तानच्या बंधपत्रित मजदूर मुक्ती मोर्चाने त्याला मुक्त केलं. स्वतंत्र झाल्यावर इकबालने साहसाने बाल मजुरीच्या विरुद्ध आवाज उठवला..

इकबालच्या कटू अनुभवाची बातमी दूर-दूर पर्यंत पोहचली. त्याने आपली कहाणी सांग्यासाठी घरापासून खूप लांबपर्यंत प्रवास केला.

इकबालने स्टॉकहोम मध्ये एका आंतरराष्ट्रीय श्रमिक संमेलनात भाषण दिले. त्याला बॉस्टनमध्ये रिबॉक ह्यूमन राइट्स फाउंडेशन कडून पुरस्कार मिळाला. संयुक्त मानव अधिकार उच्चायुक्ताने इकबालला "समकालीन गुलामी ज्यामुळे जगातली लाखो मुलं प्रभावित आहेत त्याच्या विरुद्ध पाकिस्तानात दिलेल्या लढाईचा चॅम्पियन," म्हणून त्याचा सन्मान केला.

इकबाल कायद्याचा अभ्यास करू इच्छित होता. ब्रैंडिस यूनिवर्सिटीने त्याला पूर्ण शिष्यवृत्ती दिली.

इकबाल ला गालीचा उद्योगाच्या मालकांकडून मृत्यूची धमकी दिली गेली. १६एप्रिल १९९५ला जेव्हा तो त्याच्या दोन चुलत भावांबरोबर आपल्या गावात सायकल चालवत होता,तेव्हा इकबाल ला गोळी मारून त्याची हत्या करण्यात आली, तो तेव्हा फक्त १२ वर्षांचा होता. त्याच्या मृत्युच्या वेळी परिस्थिती संशयास्पद होती.

हम खतरों से बचने के लिए प्रार्थना न करें,
बल्कि उनका सामना करते समय निडर बने रहें.

रविंद्रनाथ टैगोर





## बारा डॉलर

जोपर्यंत त्याचे आईवडील बारा डॉलरचे कर्ज फेडत नाही, तोपर्यंत चार वर्षाच्या इकबालला गालिच्याच्या कारखान्यात काम करावं लागणार होतं. एका मुलाच्या स्वातंत्र्याची किंमत फक्त बारा डॉलर होती.




“इथं पतंग आणायचा नाही!” गालिच्याच्या कारखाना मालकाने इकबालला अंधाऱ्या कारखान्यात त्याला ओढले. तिथं एकमेव खिडकी होती, ज्यावर लोखंडी गज लावलेले होते



इकबाल ला एका साखळीने विणकामाच्या मशिनला बांधून टाकलं गेलं, ज्यामुळे तो पळू शकणार नव्हता.



इक़बालने त्याच्या सारखे साखळीला बांधलेल्या मुलांच्या अनेक रांगा बघितल्या. सगळेजण अंधारात गालीचा विणत होते.



छोटी, नाजूक बोटं बारीक नमुने विणू शकत होती. इतकं बारीक की मालकाला इकबालने विणलेला पतंगाचा नमुना दिसला नाही. त्याचे हात काम करत होते, तेव्हा त्याचे डोकं आकाशात उडत होते.



इकबाल अंधाऱ्या घरात राहत होता. तो सूर्य उगवण्याच्या आधी कारखान्यात पोहचत असे आणि मग तो दिवसभर काम करत असे. सूर्य अस्ताला गेला की मग तो घरी परत येई.



एकदा रात्री घरी आल्यावर इकबालला घराच्या दरवाज्या वर नोटीस लावलेली दिसली. कर्जाच्याबाबत एक मिटिंग होणार होती. हे तेच कर्ज होतं ज्यामुळे इकबालसारखी मुलं गुलामीत ढकलली गेली होती.



इकबाल मीटिंगला गेला. त्याला कळलं की आता कर्ज बेकायदेशीर झालं आहे आणि सगळ्यांचे कर्ज आता माफ केले गेले आहे. आता तो गालिच्याच्या कारखानदाराचा गुलाम राहिला नव्हता. आता तो मुक्त झाला होता.



मग तो पळत अंधाऱ्या कारखान्यात गेला, त्याने नोटीस फडकावली आणि तो ओरडला, “आता तुम्ही सगळे स्वतंत्र झाला आहात! आपण सगळे मुक्त झालो आहोत.”



गुलामीतून मुक्त झालेला इकबाल मग शाळेत जाऊ लागला. तो अभ्यासात हुशार होता आणि त्याने वेगाने प्रगती केली. तो एक शूर मुलगा होता. म्हणून त्याने आपल्यासारख्या बंधपत्रित मुलांसाठी त्याने आवाज उठवला. कारखान्याच्या मालकांच्या धमक्या या दहा वर्षाच्या मुलाला घाबरवू शकल्या नाही.



इकबाल सर्व पाकिस्तानतील गालिच्याच्या कारखान्यात गेला. त्याने ३००० पेक्षा अधिक मुलांना स्वातंत्र्याचा संदेश दिला. मग तो आपला संदेश देण्यासाठी समुद्र पार करून अमेरिकेत भाषण द्यायला गेला.

“मी पाकिस्तानमध्ये तेच करू इच्छितो जे अब्राहम लिंकनने अमेरिकेत केलं. मला मुलांना गुलामीतून मुक्त करायचं आहे.”





जेव्हा तो पाकिस्तानात परत आला तेव्हा परत धमक्या यायला सुरुवात झाली. तरीपण बारा वर्षाचा मुलगा त्यांना घाबरला नाही. इकबाल आता स्वतंत्र्य होता.

मग एक दिवस तो जेव्हा सायकल चालवत होता तेव्हा कोणीतरी त्याला गोळी घालून मारलं.

अंतिम संस्काराच्या वेळी पाकिस्तानच्या ८०० लोकांनी या शूर मुलासाठी अश्रू गाळले.

अंत